राज्यातील ऊसतोड कामगारांच्या सर्वेक्षण/नोंदणी साठी वेब व मोबाईल ॲप्लीकेशन तयार करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०२१/प्र.क्र.१०४/महामंडळे**
महात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८/१०/२०२१

<u>वाचा</u> : १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. असंका-११२०/प्र.क्र.२०/काम-७अ, दिनांक २४/२/२०२०
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बैठक २०२०/प्र.क्र.९४/महामंडळे, दि.२१/९/२०२१

<u>प्रस्तावना :</u>

ऊसतोड कामगारांचा सर्वांगिण विकास करण्यासाठी विविध कल्याणकारी योजना राबविणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्रातील ऊसतोड कामगारांची एकूण संख्या व त्यांच्या प्राथमिक माहितीची नोंद असणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने ऊसतोड कामगारांचे तातडीने सर्व्हेक्षण/नोंदणी करणे आवश्यक आहे. सदरची माहिती प्रभाविपणे व अचूक तसेच अद्ययावत असावी, यासाठी ही माहिती ऑनलाईन पध्दतीने भरण्यासाठी वेब व मोबाईल ॲप्लिकेशन तयार करण्यात यावे, तसेच ऊसतोड कामगार ऊसतोडणीसाठी निघण्यास अल्प कालावधी शिल्लक राहीला असल्याने या कालावधीमध्ये वेब ॲप्लिकेशन तयार करण्याचे काम महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळास (महाआयटी) देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

निर्णय :-

ऊसतोड कामगारांना विविध योजनांचा लाभ देण्यासाठी राज्यातील सर्व उसतोड कामगार यांची नोंदणी करून त्यांना ओळखपत्र देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. यासंबंधीचा शासन निर्णय दि.२१.०९.२०२१ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. यानुसार ऊसतोड कामगार यांची नोंदणी करून त्यांना ऑफलाईन पद्धतिने ओळखपत्र देण्याचे काम सुरू झाले आहे. तथापि, सदरची माहिती प्रभाविपणे व अचूक तसेच अद्ययावत असावी, यासाठी ही माहिती ऑनलाईन पध्दतीने भरण्यासाठी वेब व मोबाईल ॲप्लिकेशन तयार करणे आवश्यक आहे. ऊसतोड कामगार हे ऊसतोडणीसाठी सर्वसाधारणपणे दिनांक १५ ऑक्टोबर पासून निघण्यास सुरूवात होते. ऊसतोड कामगार हे ऊसतोडणीसाठी निघण्यास अल्प कालावधी शिल्लक राहीला असल्याने या अल्प कालावधीमध्ये निविदा प्रक्रिया राबवून वेब व मोबाईल ॲप्लिकेशन तयार होण्यास उशीर होण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणून वेब व मोबाईल ॲप्लिकेशन तयार करण्याचे काम हे सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभागाअंतर्गत येणाऱ्या माहिती व तंत्रज्ञान महामंडळ (महाआयटी) मार्फत करून घेण्यात येणार आहे. याबाबत महाआयटीने शासनास प्रस्ताव सादर केला आहे. प्रस्तुत प्रस्तावात खालीलप्रमाणे खर्चाचा तपशिल दिलेला आहे.

| **Sr. No.** | **Particulars** | **Duration** | **Total Cost (In Rs.)** |
|---|---|---|---|
| (A) | **<u>Development</u>** | | |
| 1 | Development of Web and Mobile Application | 1 months | 10,52,174/- |
| 2 | Operating and Maintenance Charges | 12 months | 9,11,392/- |
| 3 | SMS Charges | | 12,000/- |
| | **Total** | | **19,75,566/-** |
| | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| (B) | **Cloud Hosting** | | |
| | Hosting Charges to Host the Application including 10% Administrative Charges of MAHAIT | 8 months | Approx 8,00,000/- |
| | | | |

**अटी व शर्ती :-**

(अ) सदर वेब व मोबाईल ॲप्लिकेशन विभागाच्या आवश्यकतेनुसार तयार करण्यात येईल.

(आ) सदर वेब व मोबाईल ॲप्लिकेशन मराठी व इंग्रजी भाषेत उपलब्ध असावे.

(इ) सदर वेब व मोबाईल ॲप्लिकेशन विकसीत करण्यासाठी राज्य व केंद्र शासनांतर्गत माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत अधोरेखीत असलेल्या सर्व नियमांचे (GIGW Complience) इ. काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

(ई) विकसीत केलेल्या प्रणालीचे Security Audit करणे अनिवार्य राहील व सदर Audit Report विभागास सादर करणे बंधनकारक राहील.

(उ) वेब व मोबाईल ॲप्लिकेशन करिता आवश्यक असलेले क्लाऊड होस्टिंग हे महाआयटी मार्फत विहीत पध्दतीचा अवलंब करुन उपलब्ध करुन देण्यात यावे.

(ऊ) सदर वेब व मोबाईल ॲप्लिकेशन विकसीत करण्यासाठी Intellectual Property Rights (IPR) हे विभागाच्या असतील. तथापि, याबाबतचे मालकी हक्क हे विभागाचे असतील.

(ए) भविष्यात विभागाने त्रयस्थ एजन्सीमार्फत सदर प्रणाली राबविण्याचा निर्णय घेतल्यास महाआयटी मार्फत हस्तांतरण प्रक्रिया करण्याच्या अनुषंगाने योग्य ते सहाय्य करणे बंधनकारक राहील.

(ऐ) सदर प्रणाली कार्यान्वित झाल्यावर याबाबतचे प्रशिक्षण देण्याबाबत महाआयटी आवश्यक ते सहकार्य करेल.

(ओ) महाआयटी, मुंबई यांनी झालेल्या खचाचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

सदरचा खर्च मागणी क्र. एन-२ मुख्य लेखाशीर्ष २२५१,००,सचिवालय,(०१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, (०१) (०१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अनिवार्य) (२२५१-०११३),१३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टामधुन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात येईल.

प्रस्तुत आदेश वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९३३/२०२१/व्यय-१४, दिनांक २७/१०/२०२१ द्वारे दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२११०२८१४५२४४५२२२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2021.10.28 14:56:09 +05'30'

**(रा. ना. सवने)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव.

२. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री (विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव.

४. मा. अ.मु.स., सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक (माहिती व तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई
७. महाआयटी, ३ रा मजला, अपीजय हाऊस, के.सी. कॉलेज जवळ, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (का. महामंडळे).